वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातुर करीता संपादित करण्यात आलेल्या जमीनीच्या वाढीव मावेजाबाबत दाखल झालेल्या २ प्रकरणी मा.उच्च न्यायालयात जमा करण्याकरिता "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (८६७४ ००१९)" या लेखाशीर्षाखाली रु.५,७६,५८,१०२/- इतकी रक्कम उपलब्ध करुन देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मकृवि-१२१०/प्र.क्र.१६२(भाग-२)/७ अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०.

संदर्भः- १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक मकृवि-१२१०/प्र.क्र.१६६/भाग-२/७ अे, दि. २ जुलै, २०११.
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि. ३ जून, २०१५.
३) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे पत्र क्र. अअ-२/कअ/भुसं/न्याय/२०१९, दि.१५ फेब्रुवारी, २०१९.

**प्रस्तावनाः**

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातुर करीता संपादित करण्यात आलेल्या जमीनीच्या वाढीव मावेजाबाबत दाखल प्रकरणी कृषी विद्यापीठाच्या विरोधात निकाल लागला. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाने सदर निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे अपील दाखल केले. मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांनी सदर अपील प्रकरणी दिलेल्या निर्णयानुसार ७ जणांच्या प्रकरणी शासन निर्णय क्र. मकृवि-२०१०/प्र.क्र.१६६/भाग-२/७-अ, दि. २ जुलै, २०११ अन्वये मंजुर व वितरीत झालेली वाढीव मावेजाची ५० टक्के रक्कम रु. २६,२४,७८,५२१/- मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे जमा करण्यात आली आहे. त्यानंतर त्यापैकी ५ जणांना न्यायालयाच्या आदेशान्वये १००% मावेजा मंजूर करण्यात आला असून त्याची रक्कम न्यायालयात जमा करण्यात आली आहे. उर्वरित दोन म्हणजेच **श्री.हरी कोकणे व श्री.रामा कोकणे** यांनी वाढीव मावेजाची उर्वरित ५०% रक्कम मिळण्याकरीता मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे सिव्हिल अर्ज दाखल केले होते. तथापि मा. उच्च न्यायालयाच्या दि.७.२.२०१८ चे सुनावणीत सदर सिव्हील अर्ज Dismiss केले असून विद्यापीठाच्या बाजूने निकाल दिला. त्यावर वादींनी सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या एसएलपी क्र.१२३०८ व १२३०९/२०१८ (एलएआर क्र.२३४/९४ हरी कोकणे व एलएआर क्र.२३५/९४ रामा कोकणे) प्रकरणी मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.४.७.२०१८ अन्वये निकाल दिला आहे. त्यानुसार उक्त दोन प्रकरणी वाढीव मावेजाची उर्वरीत ५० टक्के रक्कम मा.न्यायालयात जमा करण्याकरिता रु.५,७६,५८,१०२ /- (रुपये पाच कोटी शहात्तर लाख अठ्ठावन्न हजार एकशे दोन फक्त) एवढा निधी वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत कृषि महाविद्यालय, लातुर करीता संपादित करण्यात आलेल्या जमीनीच्या वाढीव मावेजाबाबत दाखल दोन प्रकरणी वाढीव मावेजाची उर्वरीत ५० टक्के रक्कम मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे जमा करण्याचे आदेश दिले आहेत. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांना मा.उच्च न्यायालयात अनामत रक्कम जमा करण्यासाठी **रु.५,७६,५८,१०२ /- (रुपये पाच कोटी शहात्तर लाख अठ्ठावन्न हजार एकशे दोन फक्त)** एवढा निधी या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत आहे. मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे सदर रक्कम तातडीने भरणा करण्याची दक्षता कृषि विद्यापीठाने घ्यावी. न्यायालयीन प्रकरणाचा तपशिल पुढीलप्रमाणे:-

| **एलएआर क्रमांक/एसएलपी क्रमांक** | **वादीचे नाव** | **उपविभागीय अधिकारी लातूर यांचेकडून प्राप्त विवरणपत्रानुसार मा.उच्च न्यायालयात जमा करावयाची उर्वरीत ५० % रक्कम** |
|---|---|---|
| २३४/१९९४, १२३०८/२०१८ | हरी ज्योतीबा कोकणे | रु. २,८८,२९,०५१/- |
| २३५/१९९४, १२३०९/२०१८ | रामा कोकणे मयत मार्फत वारस | रु. २,८८,२९,०५१/- |
| **एकुण** | | **रु. ५,७६,५८,१०२/-** |

२. याबाबत होणारा खर्च हा "**८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- १०१- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (८६७४००१९)" या लेखाशीर्षाखाली चालू वर्षाच्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.**

३. वर उल्लेखिलेल्या लेखाशीर्षाखाली देण्यात आलेली मंजूरी ही अंतरिम आहे. जर मा. उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा "८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (८६७४ ००१९ )" या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा.

४. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द लागला तर सदरहू रक्कम "८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (८६७४००१९)" या शीर्षाखाली जमा दर्शवून खर्च कृषि विभागाच्या लेखाशीर्ष -मागणी क्रमांक डी-३, २४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००)(०४) मराठवाडा कृषि विद्यापीठास सहाय्यक अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), भारित (२४१५ ०५८२) या अंतिम लेखाशीर्षाखाली टाकावा लागेल.

५. सदर रक्कम कोषागारातून आहरित करण्यासाठी उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर न्यायालयीन प्रकरणी विद्यापीठाने शासनाची बाजू भक्कमपणे मांडून शासनाच्या बाजूने निकाल लागण्यास तसेच मा.उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे प्रदान केलेली व जमा केलेली सदर रक्कम शासनाच्या तिजोरीत विहीत लेखाशीर्षाखाली जमा होईल हे पहावे. सदरची रक्कम कोणत्याही परिस्थितीत कोर्टातून काढून घेतली जाणार नाही व परस्पर विल्हेवाट लावली जाणार नाही याची काळजी संबंधित विद्यापीठाने घ्यावी व शासन मान्यतेशिवाय निधी अदा करण्यासंबंधी कोणतीही संमती न्यायालयात देण्यात येऊ नये.

७. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या क्र. न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि. ३ जून, २०१५ च्या शासन परिपत्रकातील तरतूदी विचारात घेऊन आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

८. या प्रकरणी महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील नियम आणि लेखासंहिता १९९१ मधील तरतुदीच्या तसेच प्रचलित शासन आदेश तसेच कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

९. सदर प्रकरणात विहीत कार्यपध्दतीने अपील करण्याची आणि अपिलाच्यावेळी भूसंपादन अधिनियमातील तरतूदी तसेच अनुषंगिक न्यायनिर्णय विचारात घेऊन सरकारी वकीलामार्फ़त शासनाची बाजू मा. न्यायालयापुढे मांडण्याची जबाबदारी विद्यापीठाची राहील.

१०. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २१४/२०२०/व्यय-१, दि.१३.१०.२०२० अन्वये तसेच अर्थ-२ कार्यासनाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२०१०१९१४४९४३५३०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB K
RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7
ad0b3115db, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac77c6a1ad4c5bfb
24951806af0a8, ou=AGRICULTURE DIARY AND FISHERTES DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2020.10.19 14:51:57 +05'30'

**( बा. कि. रासकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी
२. जिल्हाधिकारी, लातूर / जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी
३. उपजिल्हाधिकारी (भूसंपादन समन्वय), जिल्हाधिकारी कार्यालय,परभणी
४. उपविभाग़ीय कृषि अधिकारी,परभणी.
५. सरकारी वकील, मा. उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
७. वित्त विभाग(अर्थसंकल्प शाखा-२/व्यय-१),मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (कार्यासन ७अे),मंत्रालय, मुंबई.